राज्यातील दूध व दूध भुकटी निर्यातीस प्रोत्साहनपर अनुदान व दूध उत्पादक शेतकरी यांना खरेदी दरात वाढ मिळण्याकरीता करावयाच्या उपाययोजना .

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः लवेसू २०१८/प्र.क्र. ८ /पदुम-८**

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२

तारीख: २० जुलै, २०१८

**प्रस्तावना :-**

सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात विधानसभा नियम १०५ अन्वये दुधाच्या प्रश्नावर लक्षवेधी सूचना उपस्थित करण्यात आली होती. सदर लक्षवेधी सूचनेतील चर्चेत निश्चित झाल्यानुसार मा.अध्यक्ष, विधानसभा व मा. मुख्यमंत्री यांच्या उपस्थितीत सर्व संबंधित लोकप्रतिनिधी समवेत दिनांक १०.०७.२०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयाबाबत त्याच दिवशी विधानसभा सभागृहात शासनाकडून निवेदन करण्यात आले होते. तसेच दिनांक १८.०७.२०१८ रोजी दूध प्रश्नाच्या अनुषंगाने विधान परिषदेत अल्पकालीन सूचना उपस्थित करण्यात आली होती. सदर सूचनेवर चर्चा झाली असता, दूध उत्पादक शेतकऱ्यांना दूध खरेदीकरीता अनुदान देण्यासंदर्भात मा.मुख्यमंत्री महोदयांनी पुनश्च बैठक घेऊन शासनाचा निर्णय सभागृहात घोषित करावा असे ठरविण्यात आले. सदर बैठकीच्या अनुषंगाने राज्यातील सहकारी व खाजगी दुग्धउत्पादक व संबंधित लोकप्रतिनिधी यांच्या समवेत दिनांक १९.०७.२०१८ रोजी बैठक घेण्यात येऊन सर्वानुमते घेण्यात आलेले निर्णय विधिमंडळाच्या दोन्ही सभागृहात निवेदनाद्वारे शासनाकडून घोषित करण्यात आले. विधिमंडळात केलेल्या निवेदनांच्या अनुषंगाने सविस्तर प्रस्ताव दिनांक १९.०७.२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाने मान्यता दिली असून, मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार या संदर्भातील उपायोजनांना मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

अ) शासन या निर्णयान्वये दुध भुकटी व द्रवरुप दुधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भूकटी प्रकल्पांना अनुक्रमे रु. ५०/- प्रति किलो आणि रु. ५/- इतके प्रति लिटर प्रोत्साहनपर अनुदान अदा करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून मान्यता देत आहे :-

१) सदर अनुदान आगामी ३ महिन्यात निर्यात होणाऱ्या दूध आणि दुध भूकटीसाठी लागू राहील. तसेच सदर योजनेस मिळणारा प्रतिसाद लक्षात घेऊन प्रस्तूत योजना आवश्यकतेनुसार पुढे सुरु ठेवण्याबाबत स्वंतत्रपणे निर्णय घेण्यात येईल.

२) भारताबाहेर दूध व दूध भूकटी निर्यात केल्याचे सिध्द करण्याची संपूर्ण जबाबदारी सदर अनुदान मागणी करणाऱ्या प्रकल्पधारकांची राहिल.

३) अनुदान मंजूरीबाबतचे प्रस्ताव आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी तपासून स्वयंस्पष्ट अभिप्रायासह सप्रमाण शासनास सादर करणे आवश्यक राहिल.

ब) शासन या निर्णयान्वये राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित ३.५ /८.५ (गाय दूध) या गुणप्रतीच्या दुध रुपांतरणास प्रति लिटर रु. ५/- प्रमाणे अनुदान देण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे.

१. राज्यातील सहकारी व खाजगी दूध प्रकिया संस्था यांनी उत्पादित केलेल्या पिशवी बंद दुधासाठी कोणतेही अनुदान देय राहणार नाही.
२. सदर अनुदान दूध पूरवठा करणारी संस्था किंवा रुपांतरण करणारी संस्था यापैकी एका संस्थेस अनुज्ञेय राहिल.
३. जे दूध भूकटी उत्पादक रु.५/- प्रति लिटर प्रमाणे अनुदानाचा लाभ घेतील त्यांना वर “अ” येथे नमूद दूध भूकटी व दूध निर्यातीसाठीचे प्रोत्साहनपर अनुदानाचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.
४. या योजनेचा लाभ घेण्यासाठी इच्छूक संस्थांनी संबंधित प्रादेशिक दुग्धविकास अधिकारी यांचेकडे सहभागी होण्यासाठी अर्ज करणे आवश्यक राहिल.
५. या योजनेचा लाभ घेवू इच्छिणा-या संस्थांनी दूध उत्पादक शेतक-यांना रू.२५/- प्रतिलिटर प्रमाणे दि. २१/०७/२०१८ पासून खरेदीदर अदा करित असल्याबाबतचे हमिपत्र/बंधपत्र संबंधीत प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांच्याकडे सादर करणे आवश्यक राहिल.
६. या योजनेचा लाभ घेणाऱ्या प्रत्येक संस्थेने शासनाच्या दि.१३/०७/२०१७ रोजीच्या निदेशानुसार दूध खरेदी देयकाची अदायगी संबंधित शेतक-यांच्या वैयक्तिक बँक खात्यावर रोख विरहीत (ऑनलाइन ) पदधतीने अदा करणे आवश्यक राहिल.
७. ज्या संस्था उपरोक्त योजनेमध्ये सहभागी होतील त्यांनी त्यांचे पिशवीबंद दूध वितरण व त्यांच्याकडे अतिरिक्त प्राप्त होणारे दूध याबाबतचा माहे जून,२०१८ अखेरच्या आकडेवारीचा तपशील संबंधीत जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांच्या कडे सादर करणे बंधनकारक राहील.
८. उपरोक्त योजनेमध्ये सहभागी झालेल्या संस्थांनी दूध खरेदी व विक्री बाबतचे अभिलेख दररोज अदयावत ठेवणे व संबंधित जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांना देणे बंधनकारक राहिल.
९. या योजनेमध्ये ज्या संस्था दररोज किमान १० हजार लिटर प्रतिदिन दूधाची हाताळणी करतात अशा संस्थांना या योजनेत सहभागी होण्यासाठी अर्ज करता येईल. प्रतिदिन १० हजार लिटर पेक्षा कमी दूध उत्पादकांनी/संकलकांनी त्यांच्या सोईनुसार सहकारी/खाजगी संस्थेस सदर दूध दयावे व सदर योजनेचा लाभ घ्यावा.

१०. योजनेमध्ये सहभागी संस्थांनी अतिरिक्त दूध रूपांतरणासाठी दिल्याबाबतचा अहवाल दररोज जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांचेकडे सादर करणे बंधनकारक राहिल. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी असे अहवाल तपासून त्याचदिवशी अथवा दुस-या दिवशी प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांचे कडे एकत्रित अहवाल सादर करेल. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी अश्या अहवालाची तपासणी करून दर दहा दिवसांनी एकत्रित देयकांची मागणी आयुक्त दुग्धव्यवसाय यांच्याकडे सादर करतील. आयुक्त दुग्धव्यवसाय यांच्या मान्यतेनंतरच अनुदानाच्या रकमा अदा केल्या जातील अशी दक्षता घेणे आवश्यक राहिल.

११. उपरोक्त योजनेची नियमितपणे तपासणी करण्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी आवश्यकतेनुसार भरारी पथके नियुक्त करावीत.

१२.या योजनेमध्ये कोणत्याही संस्थेमार्फत अनियमितता झाल्याचे आढळून आल्यास अशा संस्था अनुदान देण्यास अपात्र ठरविल्या जातील, तसेच त्यांना वितरित केलेले अनुदान त्यांच्याकडून व्याजासह वसूल करण्यात येईल. याव्यतिरिक्त, अनियमिततेबाबत कायदेशिर कारवाईही करण्यात येईल.

क) शासन या निर्णयान्वये शालेय शिक्षण विभाग, महिला व बाल कल्याण विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभाग या विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध पोषण आहार योजनांमध्ये दूध किंवा दुध भूकटीचा समावेश करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे.

१) शालेय शिक्षण विभाग, महिला व बाल कल्याण विभाग, आदिवासी विकास विभाग ,सामाजिक न्याय विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभाग या विभागांमार्फत सुरु असलेल्या पोषण आहार योजनांमध्ये दुध/दुध भूकटीचा समावेश करण्यासाठीचे स्वतंत्र शासन निर्णय संबंधित विभागानी तात्काळ निर्गमित करावेत.

२) या बाबीवर येणारा खर्च संबंधित विभागाने त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पीय निधीतुन भागविण्यात यावा.

वरील “अ” आणि “ब” येथे नमूद योजनेवरील अनुदानावरील खर्च हा सन २०१८-१९ करीता शासकीय दूध योजनांच्या मागणी क्र.डी-५, २४०४ दुग्धव्यवसाय विकास याखाली असलेल्या २९ दूध खरेदी या उद्दिष्टाखाली मंजूर असलेल्या एकूण अनुदानातून आणि या उद्दिष्टाखाली आकस्मिकता निधीतून मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागवावा.

सदर शासन निर्णय दिनांक १९.०७.२०१८ रोजीच्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२११२४४५६६९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran V Kurundkar

Digitally signed by Kiran V Kurundkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f89b7a82db2238fb7337a9a9b8e00b9c1a35b509d1f6850ddcc783bdb12090f, cn=Kiran V Kurundkar
Date: 2018.07.21 12:46:42 +05'30'

**( किरण कुरुंदकर )**
सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (पदुम)/मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल, अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर
१५. संचालक, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
१६. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगाव, मुंबई
१८. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
१९. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
२०. निवडनस्ती.